येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे-६ येथे पूर्वीच्या
सुरक्षा भिंतीला सर्व बाजूनी समांतर अशी नवी
सुरक्षा भिंत बांधण्यासाठी

महाराष्ट्र शासन

गृह विभाग.

शासन निर्णय, क्र. बीएलडी-१०९५/१११/[भाग-२,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- २८ जानेवारी १९९७

वाचा:- कारागृह महानिरीक्षक यांचे क्र. का-३अ, इमारती/कारागृह सुरक्षा भिंत पुणे /५१६ दिनांक २३. १. ९६ चे पत्र.

निर्णय :- येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे येथे पूर्वीच्या सुरक्षा भितींला सर्व बाजूनी समांतर अशी १६१७ मिटर लांबीची व ६ मिटर उंचीची नवीन सुरक्षा भिंत बांधण्याकरिता येणा-या रुपये १,८४,९२,३७०/- [एक कोटी चौ-याऐंशी लाख न- ब्याण्णव हजार तिनशे सत्तर ]एवढ्या खर्चाच्या अंदाजपत्रक नकाशे यास शासन या आदेशाद्वारे खालील अटीच्या अधीन राहून प्रशासकिय मान्यता देत आहे.

१] यापूर्वी प्रशासकिय मान्यता दिलेली कामे प्राधान्याने हाती घेऊन नंतरच संदर्भाधिन काम हाती घ्यावे.

२] प्रस्तुत कामासाठी अर्थसंकल्पात पुरेशी तरतूद केल्याखेरीज प्रत्यक्षात काम हाती घेऊ नये. प्रस्तावित खर्च हा रु. २० लाखापेक्षा जास्त अपेक्षित असल्यामुळे त्या खर्चास सचिव समितीची मान्यता घ्यावी. तसेच व्यय अग्रक्रम समितीची मान्यता घ्यावी.

३] काम नविन स्वरुपाचे असल्याने ते विधान मंडळाच्या नजरेस आणावे.

४] प्रस्तावित बांधीकरिता मंजूर नियतव्ययात नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक - वानियो-१८९६ /प्र. प/का-१४११/दिनांक १६. ११. ९६ अन्वये कपात करण्यात आली असून कपातीनंतरच्या रकमेच्या मर्यादित राहून खर्च करावा. नियोजन विभागाकडून अतिरिक्त तरतूद उपलब्ध केली जाणार नाही.

५] काम चालू वर्षी हाती घ्यावयाचे असल्यास वार्षिक योजना १९९६-९७ मध्ये सामान्य सेवा" या उपशिर्षाखाली गृह विभागातील उपलब्ध असलेल्या अंतिम तरतूदीच्या अधीन राहून प्रस्तावाचा खर्च भागवावा. यासाठी अतिरिक्त तरतूद उपलब्ध करुन दिली जाणार नाही.

२. प्रस्तावित बांधकामावरील खर्च ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कार्यालयीन इमारती १०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना मुख्य मागणी क्र. एच-१५ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भान्वये अनुक्रमे १८४ इमारती २, दिनांक २६. ६. ९६ क्र. ३८४/१४११ दिनांक ३१. ८. ९६ व क्र. सीआर-७७९/९६/व्यय-८ दिनांक ४. १२. ९६ अन्वये त्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[श्री. प. सोनवणे]
अवर सचिव, महाराष्ट्रशासन, गृह विभाग.

.........

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे [मुख्यालय]

कारागृह उपमहानिरीक्षक येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे.

अधिक्षक येरवडा मध्यवर्ती कारागृह पुणे [सोबत नकाशे व अंदाजपत्रक जोडले आहे.]

महालेखापाल-१, महाराष्ट्र [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई/नागपूर.

महालेखापाल-१, महाराष्ट्र [लेखा व परीक्षा] मुंबई/नागपूर.

जिल्हा ~~कस्त~~ कोषागार अधिकारी पुणे.

सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारत-२, अर्थ-२.

नियोजन विभाग -१४११

वित्त विभाग व्यय-८

निवड नस्ती.